सन २०१६-१७ या वित्तीय वर्षामधील सन २०१५-१६ च्या टंचाई कालावधीसाठी ग्रामीण तसेच नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१६/प्र.क्र.१७४/पापु-१४**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

तारीख: २९ मार्च, २०१७

वाचा :-

१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र.१२/पापु-१४, दिनांक ३ फेब्रुवारी, १९९९.

२) शासन परिपत्रक, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१३/प्र.क्र.४१८/ पापु-१४, दिनांक ४.०१.२०१४

३) शासन परिपत्रक, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१३/प्र.क्र.४८/पापु-१४, दिनांक ६.०५.२०१४

४) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१६/प्र.क्र.१४३/ पापु-१४, दिनांक ४.०५.२०१६

५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांकः एससीवाय-०५/२०१६/प्र.क्र ३९/म-११, दिनांक २६ मे, २०१६ दिनांक १४ जुलै, २०१६ व दि. २५ नोव्हेंबर, २०१६

६) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक टंचाई २०१६/प्र.क्र.१७४/पापु-१४, दिनांक १८ जुन, २०१६, १६, जुलै, २०१६, १९ ऑक्टोबर, २०१६, २९ नोव्हेंबर, २०१६ आणि ६ मार्च, २०१७

७) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्रमांक लेखा कक्ष -२३/३/कावि/७६८६/१७ जा.क्र. २९७१३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१७

८) जिल्हाधिकारी, ठाणे यांचे पत्र क्रमांक सामान्य /क-१/टे-३/पाणीटंचाई/एफजेएमएस क्र. -एल १४८८५१९७३४९८९, दिनांक १६ मार्च, २०१७

९) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१७/प्र.क्र.३५/पापु-१४, दिनांक २४ मार्च, २०१७

१०) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २०१७/प्र.क्र.६/पापु-१४, दिनांक २४ मार्च, २०१७

११) शासन शुध्दीपत्र, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई२०१७/प्र.क्र.६/पापु-१४, दिनांक २४ मार्च, २०१७

**प्रस्तावना :-**

ग्रामीण व नागरी पिण्याच्या पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या उपाययोजनांवरील खर्च "२२४५-नैसर्गिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य" या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात येतो. सन २०१६-१७ या वित्तीय वर्षाकरीता महसूल व वन विभागाने पिण्याच्या पाण्याची टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या उपाययोजनांसाठी उपलेखाशिर्ष २२४५००९३ अंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या व सध्या विभागाकडे शिल्लक असलेल्या निधीतून विभागीय आयुक्त, नाशिक तसेच जिल्हाधिकारी, ठाणे यांच्याकडून संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेल्या निधी मागणी प्रस्तावाच्या अनुषंगाने तसेच पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ् नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजना /उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या स्थायी समितीच्या दि. २३.०३.२०१७ रोजी मान्यता दिलेल्या प्रस्तावाच्या तसेच संदर्भ क्र. ९ व १० येथे नमुद केलेल्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

ग्रामीण / नागरी भागात पेयजल टंचाई निवारणार्थ शासनाने विहीत केलेल्या निकषानुसार, नाशिक, अमरावती व कोकण या विभागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ राबविलेल्या/राबविण्यात येणा-या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी विवरणपत्र -अ॰ मध्ये नमूद केल्याप्रमाणे **रुपये १६१९.६७ लक्ष ( रुपये सोळा कोटी एकोणीस लाख सदुसष्ट हजार फक्त**) इतका निधी विभागीय आयुक्त, नाशिक, कोकण व अमरावती यांना प्रचलित स्थायी शासन निर्णयामध्ये विहीत केलेल्या अटी व शर्ती तसेच खालील अटींच्या अधीन राहून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

**अटी व शर्ती**

१) विभागीय आयुक्त, नाशिक, कोकण व अमरावती यांनी सदर निधी संबंधित जिल्हाधिकारी यांना वितरीत करतांना तो उपाययोजनानिहायच वितरीत होईल याची दक्षता घ्यावी.

२) सन २०१५-१६ व सन २०१६-१७ या टंचाई कालावधीसाठी ग्रामीण / नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांकरीता तसेच, या कालावधीतील प्रलंबित देयकांच्या प्रदानासाठी सदर निधी वितरीत करण्यात यावा.अन्य टंचाई कालावधीतील उपाययोजनांसाठी सदर निधी खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी.

३) निधीचे वितरण करतांना यापूर्वी संबधित उपाययोजनांना निधी वितरित करण्यात आलेला नाही याची खातरजमा करावी.

४) यापुढे टंचाई निवारणार्थ उपाययोजनांकरिता निधीची मागणी करतांना, टंचाई निवारणार्थ कोणत्या प्रस्तावित उपाययोजना कोणत्या कालावधीसाठी घ्यावयाच्या आहेत, त्यासाठी किती निधीची आवश्यकता आहे त्याबाबत बाब निहाय मागणी तसेच चालू आर्थिक वर्षात वितरीत करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादि बाबतची माहिती सादर केल्याशिवाय भविष्यात निधी मंजूर केला जाणार नाही.

५) सदर शासन निर्णयानुसार टँकरद्वारे/पिण्याच्या पाणी पुरवठा करण्यासाठीच्या उपाययोजनांकरीता जो निधी देण्यात आला आहे, त्यातून देयके अदा करताना टँकरवर जी.पी.एस. प्रणाली बसविलेली असेल व जी.पी.एस.प्रणालीवर ज्या टँकरच्या फे-यांची नोंद होईल त्याच फे-या देयकाकरिता अनुज्ञेय राहतील. पाणी पुरवठा करणा-या ज्या टँकरवर जी.पी.एस.प्रणाली बसविलेली नाही किंवा जी.पी.एस.प्रणाली बंद असल्याकारणाने टँकर वाहतूक धारकाने टँकरच्या फे-या झाल्याचा दावा केला असल्यास, अशा फे-या बनावट ठरतील व त्यासाठी सदर अनुदान अनुज्ञेय राहणार नाही. तसेच जी.पी.एस. प्रणालीची नोंद होत नाही म्हणून देयके प्रमाणित करण्यात येऊ नये व अशा प्रकारे प्रमाणित केलेल्या देयकांस निधी वितरीत करण्यात येऊ नये.

६) ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे, त्याबाबतची जिल्हानिहाय भौतिक प्रगतीची माहिती विभागीय आयुक्तांनी शासनाकडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपद्धतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणा-या प्रत्यक्ष खर्चाची माहिती पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत एकत्रितरित्या शासनास सादर करावी. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे विहीत प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच **कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही** याची दक्षता नियंत्रक अधिका-याने घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहीत वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

७) सदर निधी सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातच खर्च होणे आवश्यक आहे.तो व्यपगत होणार

नाही अथवा कोषागारातून आहरित करून बँक खात्यात काढून ठेवला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

८) **याबाबतचा खर्च "मागणी क्र. सी-६, २२४५ -नैसर्गीक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१-अवर्षण, १०२-पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, (९१)-राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (२२४५ ००९३) (दत्तमत)(वेतनेत्तर) ३१, सहायक अनुदाने" या उपलेखाशीर्षांमधून भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

९) आहरण व संवितरण अधिका-यांनी कोषागार / उप कोषागार अधिकारी यांच्याकडे पाठविण्यात येणा-या व देयकासोबत जोडल्या जाणा-या संगणक स्लीपमध्ये गौण / उपलेखाशीर्षाच्या संगणक संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा. तसेच, कोषागारातून उपकोषागारातून आहरीत केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

या शासन निर्णयान्वये करण्यात येणाऱ्या निधी वितरणाचा तपशील विभागनिहाय तसेच उपाययोजनानिहाय पुढीलप्रमाणे आहे. याप्रमाणेच विभागीय आयुक्तांनी जिल्हाधिकाऱ्यांना उपयोजनानिहायच निधीचे वितरण करावे.

**विवरणपत्र -अ**

(रक्कम रुपये लाखात)

| विभाग | जिल्हा | नळ योजनांची विशेष दुरुस्ती | टँकरने /बैलगाडीने पा.पु. | तात्पुरते पाणी पुरवठा योजना | विंधन विहीरी | विहीरींचे अधिग्रहण | एकूण मंजूर निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| नाशिक | जळगांव | ०.०० | ७२.२५ | २१५.६८ | ०.०० | ६९.०२ | ३५६.९५ |
| | अहमदनगर | ८७.४८ | ५२.०७ | ०.०० | ०.०० | ०.०० | १३९.५५ |
| | धुळे | ०.०० | ५०.०० | ०.०० | ०.०० | ५०.०० | १००.०० |
| | नाशिक | ११.०१ | ८.९२ | ०.०० | ०.०० | ०.०० | १९.९३ |
| **नाशिक एकूण** | | **९८.४९** | **१८३.२४** | **२१५.६८** | **०.००** | **११९.०२** | **६१६.४३** |
| **कोकण** | **ठाणे** | **०.००** | **११५.००** | **०.००** | **५५.११** | **०.००** | **१७०.११** |
| **अमरावती** | **बुलढाणा** | **७८३.५६** | **०.००** | **४९.५७** | **०.००** | **०.००** | **८३३.१३** |
| **एकूण** | | **८८२.०५** | **२९८.२४** | **२६५.२५** | **५५.११** | **११९.०२** | **१६१९.६७** |

टिप : बुलढाणा जिल्हयाला देण्यात आलेला निधी हा प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली

स्थापन करण्यात आलेल्या स्थायी समितीच्या बैठकीत मान्यता दिलेल्या व शासन निर्णय दि. २४.०३.२०१७ च्या अन्वये मंजुरी देण्यात आलेल्या योजनांसाठी ५० % इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०३२९१७२३५९६७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Bhagwan Sawant

Digitally signed by Mahesh Bhagwan Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d1f670a17d77c8ddff69694de2a07b7ff855dafef954aefa82ca28bd6cc6adb6, cn=Mahesh Bhagwan Sawant
Date: 2017.03.29 18:42:29 +05'30'

**(म. भ. सावंत)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. अपर मुख्य सचिव, महसूल (मदत व पुनर्वसन) विभाग, मंत्रालय मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (ग्रा.वि.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
५. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
६. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
७. विभागीय आयुक्त, नाशिक, कोकण, अमरावती
८. जिल्हाधिकारी, जळगाव, अहमदनगर, धुळे, नाशिक, ठाणे, बुलढाणा,
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव, अहमदनगर, धुळे, नाशिक, ठाणे, बुलढाणा
१०.प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई
११.उप सचिव / पापु-१४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक
१२.पापु-१४ संग्रहासाठी.